**महानिर्मिती कंपनीच्या चंद्रपूर येथे १ मे.वॅ. व प्रस्तावित ४ मे.वॅ. क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प, धुळे जिल्हयात मौ.शिवाजीनगर येथे प्रस्तावित १५० मे.वॅ. क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्यासाठी येणाऱ्या खर्चास व भागभांडवलास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण २०११/प्र.क्र.८६/ऊर्जा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८जून, २०११

<u>प्रस्तावना :-</u> कोळशाचे मर्यादित साठे, जलविद्युत निर्मितीस असलेल्या मर्यादा, प्रदूषण मुक्त तसेच पर्यावरण संरक्षणासाठी पर्यायी व अक्षय ऊर्जा स्त्रोत विकसित करणे त्याचप्रमाणे राज्य विद्युत नियामक आयोगाने एकूण वीज निर्मितीच्या ०.२५% सौर ऊर्जेद्वारे वीज निर्मिती करुन ती वीज वितरण कंपनीस विकण्याचे घातलेले बंधन हया सर्व बाबी लक्षात घेऊन सौर ऊर्जा निर्मितीस प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीने महानिर्मिती कंपनीने सौर फोटोव्होल्टाईक प्रकल्प उभारण्याचे ठरविले आहे.

महानिर्मिती कंपनीने चंद्रपूर औष्णिक विद्युत केंद्राच्या परिसरात १ मे.वॅ. क्षमतेचा सौर फोटोव्होल्टाईक वीज प्रकल्प केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालयाच्या (MNRE) मार्गदर्शक तत्वानुसार उभारला असून सदर प्रकल्प एप्रिल २०१० मध्ये कार्यान्वीत झाला आहे. त्याच ठिकाणी ४ मे.वॅ. क्षमतेचा सौर फोटोव्होल्टाईक वीज प्रकल्प उभारण्यासाठी इरादापत्र दिले आहे. सदर प्रकल्पाला जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय सौर ऊर्जा स्थलांतर योजनेअंतर्गत एनटीपीसी च्या विद्युत व्यापार निगम यांनी मान्यता दिली असून, महानिर्मिती कंपनीने एनटीपीसी च्या विद्युत व्यापार निगम यांचेबरोबर "वीज खरेदी करार" केला आहे. याशिवाय महानिर्मिती कंपनीने मौ.शिवाजीनगर, ता.साक्री, जि.धुळे येथे १५० मे.वॅ. क्षमतेचा सौर फोटोव्होल्टाईक प्रकल्प उभारण्याचे प्रस्तावित केले आहे. सदर प्रकल्पातून निर्माण होणारी वीज ही महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने (MERC) निर्धारित केलेल्या दरानुसार महावितरणला पुरविण्यासाठी करार करण्यात आला आहे. तसेच मुंबईच्या बीईएसटी वितरण कंपनीशीही करारनामा करण्यात आला आहे. मौ.शिवाजीनगर, जि. धुळे येथील सदर सौर फोटोव्होल्टाईक प्रकल्प हा एकाच ठिकाणी उभारण्यात येणारा जगातील सर्वात मोठा प्रकल्प आहे.

सदर प्रकल्प उभारण्यासाठी महानिर्मिती कंपनीस लागणारा निधी वित्तीय संस्थांकडून कर्जरुपाने प्राप्त करुन घेण्यास त्याचप्रमाणे राज्य शासनाकडून भागभांडवल उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीने सादर केलेल्या प्रस्तावावर विचार करुन राज्य शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

१. चंद्रपूर जिल्हयात १ मे.वॅ. व ४ मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जा प्रकल्प व धुळे जिल्हयात मौ.शिवाजीनगर. ता.साक्री येथे प्रस्तावित १५० मे.वॅ.क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्यासाठी येणाऱ्या एकूण अंदाजे रु.१९८७/- कोटीच्या खर्चास कर्ज व भागभांडवलाचे ८०:२० या प्रमाणात महानिर्मिती कंपनीने उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. कर्जाच्या रक्कमेत मे. के.एफ. डब्ल्यु जर्मनी यांचेकडून मिळणाऱ्या रु. १५३९.२० कोटी इतक्या रक्कमेचा समावेश आहे.

२. कर्जाची व्यवस्था महानिर्मितीने पी.एफ.सी./ इरेडा (IREDA) / के.एफ.डब्ल्यू. जर्मनी (KFW Germany) किंवा इतर वित्तीय संस्थांकडून करण्यास मान्यता देण्यात येत आहे. निधी उपलब्धतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

कर्जाची रक्कम के.एफ.डब्ल्यू. जर्मनी यांचेकडून केंद्र शासनाला प्राप्त होईल. केंद्र शासन सदर निधी रक्कम राज्य शासनाला उपलब्ध करुन देईल. राज्य शासन निधी महानिर्मिती कंपनीला उपलब्ध करुन देईल. कर्जाची परतफेड महानिर्मिती कंपनीकडून राज्य शासन, राज्य शासनाकडून केंद्र शासन आणि केंद्र शासनाकडून के.एफ.डब्ल्यू. जर्मनी अशी होईल.

३. महाराष्ट्र शासनाकडून २० टक्के भागभाडंवलानुसार एकूण रु.३९७.४० कोटीचे भागभांडवल खालीलप्रमाणे मिळण्यास व त्यासाठी नियतव्यय व अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

प्रकल्पाचे नाव व तरतूद

(रु. कोटीत)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव व क्षमता | प्रकल्पाचा खर्च १००% | कर्ज ८०% | शासनाचे भागभांडवल २०% |
|---|---|---|---|---|
| १ | चंद्रपूर येथील १ मे.वॅ. सौर ऊर्जा प्रकल्प (MNRE) | १३.०० | १०.४० | २.६० |
| २ | चंद्रपूर येथील ४ मे.वॅ. सौर ऊर्जा प्रकल्प (NVVN) | ५०.०० | ४०.०० | १०.०० |
| ३ | शिवाजीनगर ता.साक्री, जि.धुळे येथील १५० मे.वॅ. सौर ऊर्जा प्रकल्प (DISCOM & BEST) | १९२४.०० | १५३९.२० | ३८४.८० |
| **एकूण १५५ मे.वॅ.** | | **१९८७.००** | **१५८९.६०** | **३९७.४०** |

महालेखापाल कार्यालय, मुंबई यांच्याकडून जेव्हा विचारणा करण्यात येईल तेव्हा कर्ज लेख्यांसंबंधीची कागदपत्रे महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीने तपासणीसाठी महालेखापाल कार्यालय, मुंबई यांना सादर करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौ. संदर्भ क्रमांक २०८/व्य-१६/११ दिनांक ३.६.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६१७१२४८५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( सी.के.जाधव )
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) मा. राज्यमंत्री ऊर्जा यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक
६) प्रधान सचिव, वित्त विभाग
७) प्रधान सचिव, नियोजन विभाग
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर
११) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, मुंबई.
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत सूत्र धारक कंपनी मर्या.,
२१) वित्त विभाग (व्यय-१६)
२२) नियोजन विभाग (कार्यासन १४८३)
२३) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.
२४) निवड नस्ती (ऊर्जा-४)